वाहतूक सुरक्षा दलातील प्रशिक्षणार्थी छात्रांना आहार भत्ता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र.टिआरए ०१०३/सीआर-६/पोल-८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक: १ सप्टेंबर २००३

वाचा:-सह पोलीस आयुक्त (वाहतूक), बृहन्मुंबई यांचे पत्र जा.क्र २१/मंज-२/वा/२००३ दि ४/६/०३

शासन निर्णय :- मुंबई शहरात दि.३१/८/२००३ रोजी होणारे गौरी गणपती विसर्जन, दि.९/९/२००३ रोजी येणारी अनंत चतुर्दशी आणि दि.१४/९/२००३ ते दि २१/९/२००३ या कालावधीत होणा-या माऊंट मेरी जत्रेच्या उत्वसाच्या वेळेस रस्त्यावरील वाहतूक नियंत्रणाच्या कामामध्ये पोलीसांना मदत करण्यासाठी शालेय सुरक्षा पथकातील सुमारे ८५०० छात्रांची मदत घेतली जाते. या छात्रांना प्रत्येकी रु.१०/- (रुपये दहा फक्त) या दराने आहारभत्ता देण्यासाठी रु.८५,०००/- (रुपये पंच्याऐंशी हजार फक्त) एवढया रकमेस शासन मंजूरी देत आहे. मात्र या भत्यापोटी होणारा खर्च काटकसरीने करावा व कोणत्याही परिस्थितीत मंजूर केलेल्या रकमेपेक्षा अधिक होता कामा नये.

२. सदर रक्कम संक्षिप्त आकस्मिक देयकाद्वारे काढण्यासाठी परवानगी देण्यात येत आहे. मात्र सदरील खर्चाच्या समायोजनांचे तपशीलवार देयके (Detailed Contigent Bill not payble at Tresury ) हे नियंत्रक अधिका-यांच्या प्रती स्वाक्षरीने विहीत मुदतीत अधिदान व लेखा अधिकारी कार्यालयाकडे सादर करण्यात यावे, अशी अट घालण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च हा मागणी क्र."बी-१-२०५५-पोलीस (०२), शहर पोलीस कार्यालयीन खर्च इतर खर्च" या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो खर्च चालू वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र सीआर ५५५/२००३ व्यय-७, दि.३०.८.२००३ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( एस.एस.इनामदार )
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
सह पोलीस आयुक्त (वाहतूक), वरळी, मुंबई-२५.
पोलीस उप आयुक्त (वाहतूक), बृहन्मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
अधिदान व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग (व्यय-७).
निवड नस्ती.

******